नियतकालिक बदल्या-सन २०२०
सहायक प्राध्यापक, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालये, महाराष्ट्र अभियांत्रिकी शिक्षक सेवा, गट -अ

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक : बदली-२०२०/(प्र.क्र.७०/२०)/तांशि-१**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०६ ऑक्टोबर, २०२०

**शासन आदेश :**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-याच्या मान्यतेने सहायक प्राध्यापक, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालये, महाराष्ट्र अभियांत्रिकी शिक्षक सेवा, गट-अ या संवर्गातील खालील अध्यापकांची त्यांच्या नावासमोरील स्तंभ - ३ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी बदली करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अध्यापकाचे नाव व कार्यरत संस्था | बदलीचे ठिकाण | बदलीचा प्रकार |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | डॉ. श्वेता गणेश तापडीया, सहायक प्राध्यापक, औषधनिर्माणशास्त्र, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, औरंगाबाद | शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, कराड | प्रशासकीय बदली |
| २. | डॉ. मूलचंद आनंदराव शेंडे, सहायक प्राध्यापक, औषधनिर्माणशास्त्र, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, अमरावती | शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, कराड | प्रशासकीय बदली |
| ३. | डॉ. अविनाश हणमंत होसमनी, सहायक प्राध्यापक, औषधनिर्माणशास्त्र, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय ,रत्नागिरी | शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय,कराड | विनंती बदली |

२. सदर बदली आदेश तात्काळ अंमलात येतील.

३. उपरोक्त प्रमाणे प्रशासकीय बदली झालेल्या अध्यापकांना शासन नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय असेल. विनंती बदली झालेल्या अध्यापकांना शासन नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

४. सदर बदली आदेशाची प्रभावीपणे अंमलबजावणी होणे गरजेचे असल्यामुळे बदली झालेल्या अध्यापकांना संबंधित संस्था प्रमुखांनी / प्राचार्यांनी तात्काळ कार्यमुक्त करावे. याबाबतचा पाठपुरावा संबंधित विभागीय तंत्रशिक्षण सहसंचालक यांनी करावा. तसेच याबाबतचा कार्यपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून ०१ महिन्यात संचालक, तंत्रशिक्षण यांचेमार्फत शासनास सादर करावा.

५. बदली झालेल्या अध्यापकाने अनधिकृत रजेवर जाऊ नये. तसेच संबंधिताने बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

६. श्रीमती अनिता श्रीकृष्ण कुलकर्णी, सहायक प्राध्यापक, औषधनिर्माणशास्त्र, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, कराड या शासन पत्र क्रमांक बदल्या- २०१६ / प्र.क्र. (९३/१६)/ तांशि-१, दिनांक २०/१०/२०१६ नुसार दिनांक १६/११/२०१६ पासून तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, पुणे येथे उसनवारी तत्वावर कार्यरत आहेत. सदर उसनवारी तत्वावरील पदस्थापना या आदेशाद्वारे संपुष्टात आणण्यात येत असून त्यांनी तात्काळ त्यांच्या मूळ संस्थेत म्हणजेच शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, कराड येथे रुजू व्हावे.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१००६१७२०५१४५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sameer Laxman Dhere

Digitally signed by Sameer Laxman Dhere
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, serialNumber=6ee64cf9b42881125c3715a5db341b5827c5743c728bc85f04bb71ff8fc154d6, cn=Sameer Laxman Dhere
Date: 2020.10.06 17:23:21 +05'30'

**( समीर ढेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित अध्यापक (संस्था प्रमुखामार्फत)

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई.
२) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
३) मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
४) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५) सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, पुणे/ औरंगाबाद/ अमरावती/ मुंबई (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत)

६) प्राचार्य, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, कराड/ औरंगाबाद/ अमरावती/ रत्नागिरी (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत)

७) अपर मुख्य सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई

८) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत)

९) निवड नस्ती - तांशि -१.